पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातर्गत आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्यामार्फत त्यांच्या कार्यालयासाठी लॅपटॉप व मल्टीफंक्शन मशीन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः खरेदी -२०२३/प्र.क्र.०१ (भाग-१)/संगणक कक्ष**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ११ एप्रिल, २०२३.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. मातंरा-२०१५/प्र.क्र.१२५/३९ दि. २३ सप्टेंबर, २०११
२) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४ दि.२४ ऑगस्ट, २०१७
३) वित्त विभाग यांचा शासन निर्णय क्र विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२/ दिनांक १७ एप्रिल २०१५.
४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र. एमआयएस-२०२१/प्र.क्र.०१ / संगणक कक्ष दिनांक ०५ मार्च, २०२१
५) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस- २०२१/प्र.क्र.८/उद्योग-४ दिनांक ०७ मे, २०२१
६) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. संचा/नियोजन. वि/प्र.क्र.०५/संगणक/७२/२०१३ व क्र. संचा/नियोजन. वि/प्र.क्र.०५/ संगणक/७२अ / २०२३ दिनांक ०९.०२.२०२३
७) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. संचा./नि.वि./प्र.क्र.०५/संगणक सद्यस्थिती/१६६/२०२३ दि. ०६ एप्रिल, २०२३.

**प्रस्तावना :-**

माहिती तंत्रज्ञानाच्या माध्यमातून सामान्य जनतेस शासनाच्या सर्व सेवा माफक दरात पारदर्शकरिता व जलदगतीने उपलब्ध व्हाव्यात, या हेतुने संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे ई-प्रशासन धोरण जाहीर करण्यात आलेले आहे. त्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

अंतर्गत आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य यांच्या व त्यांच्या अधिनस्त कार्यालयाकरीता संगणक व ईतर सामुग्री खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या कार्यालयाचे तसेच त्याच्या अधिनस्त कार्यालयातील संगणक सामग्री प्रिंटर्स ई. कालबाह्य झाल्यामुळे कार्यालयाचे संगणकीकरण करुन संपुर्ण ई-गर्व्हनन्स च्या अनुषंगाने व भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचे बळकटीकरण करण्याच्या दृष्टीने संगणक साहीत्याची मागणी करण्यात आली आहे. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, अंतर्गत आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य यांच्या तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयाकरीता संगणक व इंतर सामुग्री खरेदी करण्यासाठी दिनांक ०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार गठीत केलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीने खालील नमूद तपशील नुसार संगणक साहित्य खरेदी करण्यास मान्यता दिलेली आहे.

| अ.क्र. | तपशील | खरेदी करावयाची संख्या |
|---|---|---|
| १ | लॅपटॉप | ७० |
| २ | मल्टीफंक्शन मशीन | १०० |
| | **एकूण** | **१७० नग** |

वर नमूद साहित्याची आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या मागणीनुसार तसेच माहिती व तंत्रज्ञान विभागाने मंजूर केलेल्या विहित Specification नुसार Gem पोर्टल वरील विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. वाय-५ ३४५१ सचिवालय आर्थिक सेवा (००) ०९० सचिवालय (०२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (०२) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकरणाची अंमलबजावणी ३४५१ २७६४- १७ संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम,भाग-२ दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग दोनमधील अनुक्रमांक २७ अ, नियम क्र. ७६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१११६०३१३९३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY D MANE

Digitally signed by SANJAY D MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7322cf22539d1c2a9ec41d18debd6a1b1822daa203eedff083386e6f6686c0f5, pseudonym=2152EF092ACE449908EC8295FCF5D4CE29D8973B, serialNumber=CC816238ED3C914E2FA2E99DA4BC0BA4E1F6947AA23AD145E3DC6A469041090F, cn=SANJAY D MANE
Date: 2023.04.11 19:00:11 +05'30'

**(संजय माने)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोखशाखे मार्फत)
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) वित्त विभाग, (व्यय-६) मंत्रालय, मुंबई
६) उप सचिव (पापु-०२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (संगणक कक्ष )